<u>अतितात्काळ</u>

विधानमंडळाच्या डिसेंबर, २०२१ च्या अधिवेशनात सादर
<u>केलेले सन २०२१-२०२२ चे खर्चाचे पुरक विवरणपत्र.</u>

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : पूरक-२०२१/प्र.क्र.१०६/अर्थ-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०३ जानेवारी, २०२२.

## <u>परिपत्रक</u>

**सन २०२१-२०२२** या वर्षाचे खर्चाचे पूरक विवरणपत्र **दिनांक २२ डिसेंबर, २०२१** रोजी विधानमंडळास सादर करण्यात आले. सदर पुरवणी खर्चास आता विधानसभेने मान्यता दिली आहे. दिनांक ३१ मार्च, २०२२ रोजी संपणा-या वित्तीय वर्षाच्या विनियोजनांमध्ये समाविष्ट करण्यासाठी, पुरवणी विनियोजन विधेयकास मा. राज्यपालांनी संमती दिली आहे आणि ते, महाराष्ट्र (तृतीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०२१ **(सन २०२१ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक-१७)** म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण,भाग-४, दिनांक ३० डिसेंबर, २०२१ यामध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे.

२. सर्व मंत्रालयीन विभागांना असे कळविण्यात येत आहे की, त्यांनी पुरवणी विनियोजन अधिनियमानुसार मंजूर झालेल्या पूरक मागण्यांच्या रकमा वाटप करण्यापूर्वी **कार्यक्रमांतर्गत खर्चाच्या पूरक मागणी संदर्भात यथास्थिती नियोजन विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, आदिवासी विकास विभाग व वित्त विभागाची आणि अनिवार्य खर्चाच्या पूरक मागणीसंदर्भात वित्त विभागाची मान्यता घ्यावी. असे मान्यता घेण्याबाबतचे प्रस्ताव पुरवणी मागण्यांच्या मुळ नस्तीवर सादर करण्यात यावेत. मूळ तरतूद अखर्चित असल्यास पुरवणी मागणी वितरीत करण्यासाठी विवक्षित कारणे असल्याशिवाय सरसकट प्रस्ताव नियोजन विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, आदिवासी विकास विभाग व वित्त विभागाला पाठवू नयेत.**

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२२०१०३१७४२५३३३०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vasant Krishna Patil

Digitally signed by Vasant Krishna Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=56462e610dbf070fe5eefa98886b167556f80b373181ed680e4c9c879d7e3617, serialNumber=14caf70544d4d2fb25d1da6ed673b0488e940d807179c09470fcdd9192ba4ce7, cn=Vasant Krishna Patil
Date: 2022.01.03 17:45:29 +05'30'

( व. कृ. पाटील )
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव
३) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधान सभा,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२.
४) सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२.

७) सर्व सह सचिव / उप सचिव (अर्थसंकल्प शाखा), सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

८) विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११०००१

९) प्रधान महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर

१०) प्रधान महालेखापाल - १/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर

११) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई-३२.

१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-३२.

१३) निवासी लेखा अधिकारी, मुंबई-३२.

१४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

१५) सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी,वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१६) निवड नस्ती, अर्थसंकल्प-३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.